विदर्भ विकास कार्यक्रम २००९-१०
शांतीवन चिचोली येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या वैयक्तिक वस्तुंकरीता स्मारक संग्रहालय, ध्यान आणि सामाजिक संस्कृतिक प्रशिक्षण केंद्राचे बाधकामाकरीता येणाऱ्या अतिरिक्त खर्चास मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः सान्यावि -२०१७/प्र.क्र.६२/बांधकामे
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २३ ऑगस्ट,२०२४.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०११/प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.१४/०३/२०११.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०११/प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.३०/०३/२०१२.
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.५.११.२०२०.
४) शासन ज्ञापन क्रमांक: अनौस-२०२०/प्र.क्र.१०२/ बांधकामे, दि.५.१०.२०२१
५) नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचे पत्र जा.क्र.का.अ.(प्रकल्प-१)/३२०३, दि.१३.०३.२०२४ रोजीचे पत्र.

प्रस्तावना :-

शासनाच्या विदर्भ विकास कार्यक्रम २००९-१० अंतर्गत भारतीय बौध्द परिषद, शांतीवन चिंचोली नागपूर या स्वयंसेवी संस्थेच्या मालकीच्या नागपूर मधील खाजगी जमिनीवर शांतीवन चिचोली येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या वैयक्तिक वस्तुंकरीता स्मारक संग्रहालय, ध्यान आणि सामाजिक संस्कृतिक प्रशिक्षण केंद्राचे बाधकाम करण्याचे ठरविले आहे. त्यास अनुसरून शासन निर्णय दि. १४.३.२०११ अन्वये रू. ५.०० कोटी व दि. ३०.३.२०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु. ३५.७६ असे एकुण रु. ४०.७६ कोटीच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. संदर्भ क्र.५ अन्वये, सह आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर यांनी दि.१३.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये, शांतीवन चिचोली येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या वैयक्तिक वस्तुंकरीता स्मारक संग्रहालय, ध्यान आणि सामाजिक संस्कृतिक प्रशिक्षण केंद्राचे बाधकाम या करिता वरील तक्त्यातील निविदेनुसार प्रकल्पावर झालेले काम व सुरू असलेल्या कामाकरीता जीएसटी रक्कम रू.२,४६,६७,७३२/-(अक्षरी रुपये दोन कोटी शेहेचाळीस लक्ष सदुसष्ट हजार सातशे बत्तीस फक्त) इतक्या रक्कमेच्या खर्चास मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. उपरोक्त प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

शासनाच्या विदर्भ विकास कार्यक्रम २००९-१० अंतर्गत भारतीय बौध्द परिषद, शांतीवन चिंचोली नागपूर या स्वयंसेवी संस्थेच्या मालकीच्या नागपूर मधील खाजगी जमिनीवर शांतीवन चिचोली येथे डॉ.

बाबासाहेब आंबेडकर यांच्या वैयक्तिक वस्तुंकरीता स्मारक संग्रहालय, ध्यान आणि सामाजिक संस्कृतिक प्रशिक्षण केंद्राचे बाधकामाकरीता रु. ४०.७६ कोटीच्या रक्कमेस लेखाशिर्ष २२२५ ३६३६ अंतर्गत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

२. सदर प्रकल्पाचे कामास दिनांक २७.०६.२०१६ च्या कार्यादेशान्वये सुरूवात झालेली होती. त्यावेळी असलेल्या दरसूचीमध्ये व्हॅट (VAT) चे प्रावधान होते. मात्र वित्त विभाग शासन निर्णय दिनांक ११.०९.२०१७ अन्वये दिनांक १.७.२०१७ पासून वस्तु व सेवा कर (GST) लागू करण्यात आलेला आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र.५ अन्वये सादर केल्यानुसार प्रकल्पावर झालेले काम व सुरू असलेल्या कामाकरीता जीएसटी रक्कम रू.२,४६,६७,७३२/-(अक्षरी रुपये दोन कोटी शेहेचाळीस लक्ष सदुसष्ट हजार सातशे बत्तीस फक्त) निधीची आवश्यकता आहे. त्यानुषंगाने कंत्राटदाराने जीएसटीचे भुगतान केलेले असल्याने प्रशासकीय मान्यतेच्या व्यतिरिक्त वस्तु व सेवा कर (जीएसटी) रू.२,४६,६७,७३२/-(अक्षरी रुपये दोन कोटी शेहेचाळीस लक्ष सदुसष्ट हजार सातशे बत्तीस फक्त) इतका निधी नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त प्रस्तावास संदर्भ क्र. ०१ येथील दि. १४.०३.२०११ रोजीच्या व संदर्भ क्र. ०३ येथील दि. ५.११.२०२० अन्वये निर्गमित शासन निर्णयात नमूद अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर बांधकामावरील खर्च हा मागणी क्र.एन-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०५), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (०५)(०२), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (वि.घ.यो.) (२२२५ ३६३६), ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (योजनातर्गत-दत्तमत्त) या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षात मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. संदर्भ क्र.४ अन्वये, सदर योजनेअंतर्गत सहसचिव/उपसचिव(अर्थसंकल्प) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे व संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच योजनेअंतर्गत मंजूर निधीचे वितरण हे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद २ मध्ये नमूद अटीच्या अधीन काटेकोरपणे करण्याची जबाबदारी सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण , छत्रपती संभाजी नगर यांची राहील.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र २०२४०८२६१२५७३४२६२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA VIJAYSINH DESHMUKH

Digitally signed by PRADNYA VIJAYSINH DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=a2dd85b17cd3d5311cdc96ff87ec7bb1ccc64c56294fd60222073f2bd8dec000,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=3D331EE44AE91C7D48D9B9DBBF7B7A7264F269283FAC405332FED75CFA968E89, cn=PRADNYA VIJAYSINH DESHMUKH
Date: 2024.08.26 13:12:45 +05'30'

**( प्र. वि.देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, समाजकल्याण, पुणे.
२. महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर

३. उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
५. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
६. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर.
८. सहायक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर.
९. जिल्हाकोषागार अधिकारी, पूणे/नागपूर.
१०.निवडनस्ती (बांधकामे)